**पोषण अभियानातंर्गत राबविण्यात येणा-या उपक्रमांची तसेच ICT-RTM कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.३३३/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९

**पहा :** - १) महिला व बाल विकास विभाग शा.नि.क्रमांक एबावि-२०१८/प्र.क्र.२७/का.६, दिनांक ११ जुलै २०१८
२) राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष,पोषण अभियान,नवी मुंबई पत्र क्रमांक एबाविसेयो/पोषण अभियान/३५५९/२०१८,दिनांक २८ सप्टेंबर २०१८
३) सामान्य प्रशासन ( माहिती तंत्रज्ञान ) विभाग,शासन निर्णय क्र. मातंसं-१७१७/प्र.क्र.१११/३९, दिनांक २४ मार्च २०१७
४) सामान्य प्रशासन ( माहिती तंत्रज्ञान ) विभाग,शासन निर्णय क्र. मातंसं-१७१७/प्र.क्र.१११/३९, दिनांक ०३एप्रिल २०१८
५) महिला व बाल विकास विभाग पत्र क्रमांक एबावि-२०१८/प्र.क्र.३३३/का.६,दि.१४/१/२०१९
६) राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष,पोषण अभियान,नवी मुंबई पत्र क्रमांक एबाविसेयो/पोषण अभियान/२०१८-१९/२५२,दिनांक १७ जानेवारी २०१९

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाकडुन पोषण अभियानाची देशातील सर्व राज्यांमध्ये टप्प्या-टप्प्याने अंमलबजावणी करण्यात येणार आहे. केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने अंमलात आणलेला (ISSNIP) कार्यक्रमाचा पोषण अभियाना मध्ये अंतर्भाव करुन त्याची राज्यात अंमलबजावणी करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सन २०१७-१८ व २०१८-१९ यावर्षात फेज १ व २ अंतर्गत राज्यातील ३० जिल्हयांतील ४४४ प्रकल्पांमधील ८५४५२ अंगणवाडी केंद्रामध्ये राष्ट्रीय पोषण मिशन राबविण्यास केंद्र शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. केंद्र शासनाचे पत्र क्र. No.NNM/६१/२०१८, CPMU, दिनांक २५ मे २०१८ अन्वये राष्ट्रीय पोषण मिशनचे नांव बदलून पोषण अभियान नामकरण करण्यात आलेले आहे. पोषण अभियाना अंतर्गत समाविष्ट असलेल्या फेज- I व फेज- II जिल्हयांमध्ये पोषण अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी सन २०१८-१९ मध्ये करण्यास व उर्वरीत ६ जिल्हयांमध्ये पोषण अभियानाची अंमलबजावणी सन २०१९-२० मध्ये करण्यास दिनांक ११/७/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. **आता केंद्र शासनाने राज्यातील सर्व जिल्हयात पोषण अभियान कार्यक्रम सन २०१८-१९ पासून राबविण्यास मंजूरी देलेली आहे**.

३. राज्यात पोषण अभियानाचा कार्यक्रम राबविण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापन व मनुष्यबळाची आवश्यकता आहे. पोषण अभियानाचे प्रभावी संनियंत्रण व अंमलबजावणीकरीता संस्थात्मक संरचना केंद्र, राज्य, जिल्हा व प्रकल्प स्तरावर असणे आवश्यक आहे. मनुष्यबळाच्या शैक्षणिक पात्रता / अर्हता व

अनुभव केंद्र शासनाने निर्धारित केल्यानुसार पदे भरण्यास मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांच्याकडून ६२८ पदे ११ महिन्यासाठी उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या पोषण अभियान योजनेनुसार राबविण्यात येणा-या उपक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी तसेच ICT-RTM (Information Communication Technology Enable Realtime Monitoring) कार्यक्रमातंर्गत अंगणवाडी सेविकांना प्रशिक्षित करण्यासाठी ११ महिन्यासाठी ६२८ पदे **(दिनांक १ फेब्रुवारी २०१९ ते दिनांक ३१ डिसेंबर २०१९)** या कालावधीसाठी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळामार्फत भरण्यास शासन मान्यता देत आहे. सदर पदे खालीलप्रमाणे राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष,पोषण अभियान,नवी मुंबई यांनी माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून उपलब्ध करुन घ्यावीत.

| अ.क्र | तपशिल | मनुष्यबळ संख्या | मा.तं.विभाग दिनांक 3/4/2018 शा.नि.नुसार प्रति व्यक्ती प्रतिमाह अनुज्ञेय वेतनाचे दर ( कराव्यतिरिक्त) |
|---|---|---|---|
| **State level** | | | |
| 1 | Project Associate (System Support Engineer) | 3 | 38610/- |
| **District level** | | | |
| 5 | District Coordinator (System Support Engineer) | 36 | 38610/- |
| 6 | District Project Associate ( IT Office Assistant) | 36 | 24,948/- |
| **Block level** | | | |
| 8 | Block Coordinator ( IT Office Assistant) | 553 | 24,948/- |
| | **Total Positions** | **628** | |

२) माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून मनुष्यबळ उपलब्ध करुन घेताना सदर मनुष्यबळ फक्त ११ महिन्यासाठी घेण्यात येत असल्याच्या अटी/शर्ती राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान,नवी मुंबई यांनी महामंडळाकडे मनुष्यबळाची मागणी नोंदविताना करावी.

३) माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून उपरोक्त मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्याचे कामकाज ज्या कंपनीस सोपविण्यात येणार आहे त्या कंपनीला कामकाज सोपविल्याचे माहिती तंत्रज्ञान महामंडळाचे आदेश तसेच कंपनीने नियुक्त केलेल्या प्रत्येक उमेदवाराची माहिती त्याचप्रमाणे नियुक्त उमेदवारांना दरमहा कंपनी किती वेतन देणार आहे याबाबतचा तपशील राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान,नवी मुंबई यांना सादर करणे संबधित कंपनीस बंधनकारक करण्यात यावे.

४) माहिती तंत्रज्ञान महामंडळाने उपरोक्त प्रमाणे उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळासाठी माहिती तंत्रज्ञान महामंडळाने सादर केलेल्या देयकानुसार अनुज्ञेय असलेला निधी माहिती तंत्रज्ञान विभागाच्या

दिनांक ३/४/२०१८च्या शासन निर्णयात नमुद दरानुसार पोषण अभियान कार्यक्रमासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधुन उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२११४९२७७१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.02.02 11:51:22 +05'30'

**( ला. रा. गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय,मुंबई
२) प्रधान सचिव ( माहिती तंत्रज्ञान) माहिती तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय,मुंबई
३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
४) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान,नवी मुंबई
६) मुख्य प्रकल्प व्यवस्थापक,महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ,मंत्रालय,मुंबई
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
९) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग.
१०) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद
११) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
१२) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१३) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
१४) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) कक्ष अधिकारी (का.४) महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१७) वित्त विभाग,(व्यय-६) मंत्रालय, मुंबई
१८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती (कार्यासन ६).